**कोव्हीड-१९ या आजारामुळे मृत पावलेल्या व्यक्तीच्या नजिकच्या नातेवाईकास सानुग्रह सहाय्य मंजूर करण्यासाठी खर्च करण्यास मंजूरी देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन ज्ञापन क्र. :- सीएलएस-२०२१/प्र.क्र.३२५/म-३,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १७ फेब्रुवारी, २०२२

वाचा :-१) शासन निर्णय,महसूल व वन विभाग, क्र.सीएलएस-२०२१/प्र.क्र.२५४/म-३, दि.२६.११.२०२१
२) शासन निर्णय,महसूल व वन विभाग, क्र.सीएलएस-२०२१/प्र.क्र.२५४/म-३, दि.०८.१२.२०२१
३) शासन परिपत्रक,महसूल व वन विभाग,क्र.सीएलएस-२०२१/प्र.क्र.२५४/म-३, दि.०८.१२.२०२१

**ज्ञापन :-**

अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांना असे कळविण्याचे मला निदेश आहेत की, वर नमूद दिनांक २६.११.२०२१ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार, कोव्हीड-१९ या आजारामुळे मृत पावलेल्या व्यक्तींच्या जवळच्या नातेवाईकास रू.५०,०००/- इतके सानुग्रह सहाय्य प्रदान करणे या योजनेकरिता जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाकडून मंजूर करण्यात येणाऱ्या १०,००० अर्जदारांना रू.५०,०००/- प्रत्येकी याप्रमाणे एकूण रु. ५०,००,००,०००/- ( रुपये पन्नास कोटी फक्त ) इतकी रक्कम मंजूर करण्यात येत आहे.

०२. वर नमूद शासन परिपत्रक दिनांक ०८.१२.२०२१ अन्वये विहित कार्यपध्दतीनुसार अधिदान व लेखाधिकारी कार्यालयास रु. ५०,००,००,०००/- ( रुपये पन्नास कोटी फक्त ) इतक्या रकमेचे देयक सादर करण्याची कार्यवाही तातडीने करण्यात यावी.

**३.** देयक मंजूर झाल्यानंतर देयकाची रक्कम ईसीएसव्दारे या योजनेच्या अंमलबजावणीसाठी उघडण्यात आलेल्या खालील तपशीलाच्या बँक खात्यामध्ये जमा करण्यात यावी.

| बँकेचे नाव | शाखा | खातेदाराचे नाव | खाते क्र. | IFSC Code |
|---|---|---|---|---|
| **कोटक महिंद्रा** | **खेतान भवन, १९८, जमशेदजी टाटा रोड, मुंबई - ४००० २०** | **सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग** | **९५४५४६२८५४** | **KKBK0000647** |

४. ही रक्कम आरटीजीएस/एनईएफटीव्दारे तातडीने संबंधित लाभार्थीस वितरीत करावे.

५. या योजनेवरील होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, प्रधान लेखाशीर्ष २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय्य, १०१ अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या

मानकानुसार खर्च, (९१)(०१) रोख भत्ता, मृत व्यक्तींच्या कुटूंबियांना सहाय्य जखमींना मदत (अनिवार्य), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२४५ ०१५५) या लेखाशीर्षाखाली पुर्नविनियोजनाव्दारे उपलब्ध होणाऱ्या निधीमधून भागविण्यात यावा.

६. याबाबतचे देयके अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांना सादर करण्याकरिता, लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, आहरण व संवितरण अधिकारी आणि वित्तीय सल्लागार व सह सचिव यांना नियंत्रक, अधिकारी, म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. या योजनेखालील लाभार्थ्यांची संख्या मोठया प्रमाणात असलयाने आणि संगणकीय प्रणालीव्दारे आधार संलग्नीत खात्यामध्ये रक्कम जमा होणार असल्याने देयकासोबत लाभार्थ्यांचा तपशील उपलब्ध करून दिला जाणार नाही. मात्र, प्रत्येक देयकाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापालांना वर्षाच्या अखेरीस सादर करण्यात येईल.

८. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२२०२१७१५१२३८०९१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2022.02.18 13:11:01 +05'30'

**( संजय औ. धारूरकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

कक्ष अधिकारी, म-११, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
३. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
४. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई,
५. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
६. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
७. निवड नस्ती (कार्यासन/ म-३).